सन २०१८-१९ या वर्षातील प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) अंतर्गत प्राप्त झालेला केंद्र शासनाच्या हिश्याचा (अनुसूचित जाती उपयोजना) निधी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक:- प्रआयो-२०१९/प्र.क्र.९३/योजना-१०
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ०५ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :-**

१) उप संचालक, (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/०३/२०१८-RH (A/C)-१/A-Maharashtra, दि.२१.१०.२०१९ रोजीचे आदेश.

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. १४३०/न.क्र.१६९/लेखा/(प्रआयो)/२०१९, दि.३०.१०.२०१९.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण या योजनेसाठी केंद्र शासनाने सन २०१८-१९ या वर्षातील पहिला हप्ता म्हणून सन २०१९-२० या वर्षात महाराष्ट्र राज्यास रू. २४,५५,३६,०००/- (अक्षरी रूपये पंचवीस कोटी पंचावन्न लक्ष छत्तीस हजार फक्त) (अनुसूचित जाती उपयोजना) एवढा निधी संदर्भाधीन क्र. १ येथील आदेशान्वये मंजूर करून वितरीत केलेला आहे. सदर निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१९-२० या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. व मागणी क्र. एल-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७०२ जवाहर ग्राम समृध्दी योजना, (०१) प्रधानमंत्री आवास योजना, (०१)(०३) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (एससीएसपी) अनुसूचित जाती उपयोजना (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२५०५ ३००१), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन

कक्ष ग्रामीण -गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग अर्थोपाय शाखेचा अनौपचारीक संदर्भ क्र. ३९४/अर्थोपाय, दि. ०५.११.२०१९ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ६/SJSA दि. १८.०१.२०२० तसेच, शासन परिपत्रक वित्त विभाग दि. ०८.०७.२०१९ अन्वये दिलेल्या सुचनांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२०५१३१११६५२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hemant Sudhakar Pathak

Digitally signed by Hemant Sudhakar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a58924bb1ebc2ed6699e048bfa42ad41d1ed32de1e3eda84d0c03040473905e, cn=Hemant Sudhakar Pathak
Date: 2020.02.05 15:13:54 +05'30'

**(हे.सु.पाठक)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)

२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, कम्बाटा इमारत, ४२ महर्षी कर्वे रोड चर्चगेट, मुंबई.

३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन बेलापूर

५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) सामाजिक न्याय विभाग (वि.घ.योजना), मंत्रालय, मुंबई -३२.

७) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय मंबई-३२.

८) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.

९) निवड नस्ती (योजना-१०)